सन २०२४-२५ करीता राज्य योजनेंतर्गत वनकर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (४४१५ ०१५४) या योजनेंतर्गत वन प्रशिक्षण संस्था, शहापूर यांना निधी वितरीत करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०२४/प्र.क्र.४८ (१) (ब) /फ-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ७ मार्च, २०२५

**वाचा** :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. एफडीएम-२०२४/प्र.क्र.४८ (१) /फ-२, दि.२७.११.२०२४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म. रा., नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३५/१०८२/२०२४-२५, दि.१८.०२.२०२५.

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ करीता "वन कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण" (४४१५ ०१५४) या राज्य योजनेअंतर्गत "१३-कार्यालयीन खर्च" रु.३०.३२ लक्ष व "५०- इतर खर्च" रु.९८०.५८ लक्ष असे एकूण **रु.१०१०.९० लक्ष** इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

**२.** अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपुर यांनी यापुर्वी मागणी केल्यानुसार व वित्त विभागाने मंजूरी दिल्यानुसार "वाचा" क्र.२ येथील शासन निर्णयान्वये "वन कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण" (४४१५ ०१५४) या योजनेसाठी "१३-कार्यालयीन खर्च" व "५०- इतर खर्च" या उद्दिष्टांखाली **अर्थसंकल्पीत तरतुदीपैकी एकूण रु.४०४.०० लक्ष** (४० %) इतका निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**३.** आता, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी त्यांच्या "वाचा" क्र.४ येथील प्रस्तावान्वये मागणी केल्यानुसार, लेखाशीर्ष "४४१५ ०१५४" या लेखाशिर्षांतर्गत १३- कार्यालयीन खर्च रु.५.०० लक्ष इतका निधी शहापूर या वन प्रशिक्षण संस्थेला उपलब्ध करुन देण्याबाबत शासनास विनंती केली आहे.

**४.** वित्त विभागाच्या "वाचा" क्र.३ येथील दि.१२.०२.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील निधी वितरणासंदर्भातील सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. यानुसार, सन २०२४-२५ च्या भांडवली व महसूली लेख्यातील १३- कार्यालयीन खर्च या उद्दिष्टासाठी अर्थसंकल्पीत निधी वितरणाची मर्यादा एकूण वार्षिक तरतुदीच्या ८० टक्के निश्चित करण्यात आली आहे.

**५.** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या दि.१८.०२.२०२५ रोजीचे पत्रान्वये मागणी केलेली १३- कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गत रक्कम रु.५.०० लक्ष ही ८०% मर्यादेत आहे. तसेच वित्त विभागामार्फत १३- कार्यालयीन

खर्च या उद्दिष्टांतर्गत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्सवर)८०% मर्यादेत निधी उपलब्ध करुन दिला आहे.

६. या अनुषंगाने “वन कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण” (४४१५ ०१५४) या योजनेच्या उक्त उद्दीष्टांकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी प्रस्तावित केल्यानुसार आणि वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर निधी उपलब्ध करुन दिल्यानुसार (बीम्सवर)“वन कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण” (०१५४ ४४१५) या योजनेसाठी “१३-कार्यालयीन खर्च” या उद्दिष्टांखाली **अर्थसंकल्पीत तरतुदीपैकी एकूण रु५..००लक्ष** इतका निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे .

१) सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

२) उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३) सदर योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

४) नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

५) सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी तसेच या अनुषंगाने वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

६) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

७) सदर आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

८) सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

९) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी संस्थेला मागील वर्षाकरिता उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र

देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

१०) उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११) तसेच, सदरची कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० तसेच प्रचलित कायदे व नियम यामधील तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

**२.** सदर योजनेवर होणारा खर्च “मागणी क्र.सी.१०, प्रधान शिर्ष - ४४१५ कृषीविषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनाअंतर्गत योजना, २७७ शिक्षण, (००) (०३) वन कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (राज्य) (४४१५ ०१५४)” या लेखाशिर्षांतर्गत “१३-कार्यालयीन खर्च” या उद्दिष्टांखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये संबंधित प्रशासकीय विभागास निधी वितरीत करण्यास दिलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०७१५१७४७२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

RAMESH NAMDEO JAGTAP

Digitally signed by RAMESH NAMDEO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0c19f5aff07e8e032316c50df2eee86d4eadc6e4ac1e502c4ce53a7762e7e059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B42F1BB542CD2BC481C3C6F994B28EBD58BB368E14A9C6CBD23808C8315A965C, cn=RAMESH NAMDEO JAGTAP
Date: 2025.03.07 15:18:52 +05'30'

**(रमेश जगताप)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) मुख्य वनसंरक्षक (संशोधन), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) संचालक, वनप्रशिक्षण संस्था, शहापूर/पाल/जालना.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
९) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर / पूणे
११) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१२) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.